नवनाथ भक्तिसार    अध्याय तेवीसावा

किलोत्त्ला अर्थात मैनाकिनी शापमुक्त होऊन स्वस्थांनी म्हणजे सिंहलद्वीप येथे गेली. तीर्थाटनासाठी निघालेले मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ आणि मीननाथ हे मजल दरमजल करीत कौलबंगाल, गौडबंगाल आदी देशाच्या सीमा पार करून हेलापट्टण नगरीच्या सिमेपर्यंत पोहोचले. प्रवासात मच्छिंद्रनाथांना गुरुबंधू अग्निपुत्र; जालिंदरनाथ, राजा गोपीचंद आणि गोपीचंदाची माता; मैनावती यांच्याबद्दलची साद्यंत हकीकत समजली होती पण या हकीकतीचा उतरार्ध त्यांना माहित नव्हता. विशेषतः जालिंदरनाथ समाधी अवस्थेत असतानाच राजा गोपीचंदाने त्यांना भूगर्भात गाडले, हे कळताच त्यांना अतिशय यातना झाल्या होत्या. गोपीचंदाविषयी त्यांच्या मनात अढी निर्माण झाली होती पण हेलापट्टण ग्रामस्थांकडून कळले की केवळ गैरसमजातून ही आपत्ती निर्माण झाली आणि जालिंदरनाथांच्या शिष्य कर्ण कानिफाने अत्यंत समंजसपणे, चातुर्याने या आपत्तीचे निराकरण ही केले आहे. त्या अनुषंगाने त्यांनी योगिनी मैनावातीची भेट घेतली आणि तिचे कौतुक करून तिला आशीर्वादही दिला. नंतर तीनही नाथ पुढील यात्रेसाठी निघाले. जगन्नाथपुरीस जगन्नाथाचे दर्शन घेऊन सौराष्ट्रात आले. तिथे गुरुशिष्यांनी एकमेकास पारखण्यासाठी जे दिव्य केले ते वाचावयास मिळाले. अर्थात श्रीगुरूंना अभिमान वाटावा अशीच गोरक्षनाथांची तयारी झाली होती असो!

अहर्निशपणे, अखंडित तीर्थाटन सुरु आहे. गोरक्षनाथांचे चिंतन सुरु आहे. तेलंग देशात हे तीनही नाथ आले आहेत. येथे गोदावरी पूर्व समुद्राला मिळते त्या संगमावर स्नान केले आणि आत्म शिवलिंगाची मनोभावे पूजा केली. तेथून गोदावरी नदीच्या किनाऱ्याने पश्चिमीकडे वळले. बारा ज्योतिर्लिंगांपैकी औंढ्या नागनाथ आणि परळी वैजनाथांचे दर्शन घेतले. गोदावरीच्या काठासामीपच्या परिसराने फिरत घोर अरण्यमय अशा वाल्मिकी स्थानाजवळील गर्भगिरी पर्वताच्या घनदाट वनराईत प्रवेश केला. गवत असे काही अस्ताव्यस्थ वाढले होते की चालण्यासाठी पाउलवाटही अस्तित्वात नव्हती. गगनचुंबी वृक्षांच्या गर्दीत बोरी, बाभळी, पळस, शमी, खैर, हिवर यांसारखे काटेरी वृक्षांची बेसुमार वाढलेल्या उंचीमुळे दिवसाही वातावरण अंधकारमय असायचे आणि वाघ, सिंह, जंबुक, वराह, अस्वल अशासारख्या हिंस्त्र प्राण्यांच्या अस्तित्वासह पावलापावलांवर मृत्यूही आपले आस्तित्व दाखवीत आहे. त्या गर्द हिरव्या वनराईत रंगीबेरंगी फुलेही असल्यामुळे असे वाटे की सूर्यदेवाच्या अर्थात परपुरुषाच्या नजरेपासून आपला देह झाकण्यासाठी पृथ्वीने रंगीबेरंगी फुलांच्या बुट्टेदार हिरव्या शालुने स्वतःचा देह झाकून घेतला आहे.

अशा प्रकारच्या त्या निबिड अरण्यांतून या तीन नाथांची पदयात्रा सुरु आहे पण मच्छिंद्रनाथांची अवस्था गोंधळलेली आणि कुठल्यातरी प्रकारचे त्यांना भय वाटते आहे अशी झाली होती आणि ती अवस्था त्यांच्या देहबोलीतून प्रकट होत होती. त्याचे कारण म्हणजे मैनावतीने त्यांच्या झोळीत टाकलेली सुवर्ण वीट. कुणा तस्कराने अथवा वाटमाऱ्याने लुटमार केली तर, या भयाने त्यांचे काळीज धडधडू लागले, खर तर त्यांच्यासारख्या महापराक्रमी योग्याने कृतांत काळांचेही भय बाळगण्याचे कारण नव्हते. अशा विद्या आणि कला त्यांना अवगत होत्या आणि सर्वच अग्रणी देवदेवतांचा त्यांना अनुग्रह लाभला होता. पण त्या अवस्थतेमागील सत्य एकाच होते की शिष्य गोरक्षाने जशी आपली पारख करण्याचा अल्पसल्प प्रयत्न केला तशी आपणही त्याच्या धैर्याची आणि बुद्धिमत्तेची पारख करावी, हा सुश्र हेतु होता अन्य काही आकस वा प्रयोजन नव्हते कारण साक्षात सूर्यनारायणाने अंधाराचे भय बाळगावे, सागराने पक्षाच्या चिमुकल्या चोचीला

घाबरावे, मंदार पर्वताने मशकाच्या उड्डाणाला घाबरावे, किंवा गरुडाने सर्पदंशाचे वा विंचू दंशाला घाबरून जावे, तसे मच्छिंद्रनाथांनी तस्कराचे भय बाळगावे हे असंभवनीय!

तर त्या भयावह अरण्यातून वाटचाल करताना श्रीगुरू म्हणतात, "काय किर्र आणि दाट जंगलातून आपण वाटचाल करीत आहोत गोरक्षा! येथे हिंस्त्र प्राण्यांबरोबरच तस्करांचे भय असणारच, मला तर भय वाटू लागलेय. तुम्ही सावध रहा. जेथे सूर्यप्रकाश सुद्धा पोहचू शकत नाही अशा भयानक अरण्यात वाटमारे लुटारू आणि तस्कर असणारच यात संदेह नाही, तुझे मत काय?" गोरक्षनाथांनी मनोमनी जाणले की, "गुरुदेवांना तस्करांची भीती का वाटू लागली आहे? या जंगलातील हिंस्त्र श्वापदांचा वावर असताना त्याविषयी हे भय बाळगत नाहीत म्हणजे काहीतरी मौल्यवान धन त्यांच्याकडे असले पाहिजे." पण उत्तरादाखल ती म्हणाला, "मी तरी काय सांगू? असे म्हणत अधिक खोलात न जाता मौन धरून तो चालत होता पण वाटचाल करीत अधिक घनदाट आणि निर्मनुष्य रानात आल्यावर श्रीगुरूंची चर्या गंगारलेली आणि काळजीयुक्त वाटू लागली, "कसले भय त्यांना वाटत असावे?" त्यांनी पुन्हा विचारले, "गोरक्षा! काय भयंकर अरण्य आहे हे? चोर, लुटारू, तस्करांची भीती आहे की नाही ते मला सांग, मला तर भय वाटू लागले आहे." गोरक्ष काहीही प्रतिक्रिया व्यक्त न करता मौनपणे चालत राहिले, खुपसे अंतर पार केल्यावर त्यांना पाण्याचा साठा असलेले तळे दिसले. तेव्हा गुरुदेव म्हणाले, "मुला! येथे नितळ शुद्ध पाणी दिसत आहे. ही माझी झोळी घेऊन पुढे हो. मी थोड्यावेळाने येथोच तुझ्या मागे." गोरक्षनाथांच्या खांद्यावर मीननाथ होताच. स्वतःची झोळीही खांद्यावर होतीच. दुसऱ्या खांद्यावर श्रीगुरूंची झोळी अडकवून चालू लागला. श्रीगुरूंची झोळी जरा वजनदारच होती. काही अंतर चालून गेल्यावर झोळीच्या वजनाने खांद्याला कळा येऊ लागल्या, या झोळीत एवढे वजनदार काय असावे, या उत्सुकतेने झोळीत हात घालून पाहतोय तर शुद्ध सोन्याची मोठी वीट निघाली. मनात म्हणाले, "स्वामींच्या भयाचे हे कारण आहे काय? उगाचच घाबरतात. विनाकारण असले भय कशाला स्वतःजवळ ठेवायचे?" असा विचार करून जोराने वीट झुगारून दाट गवतात फेकली. साधारण पणे तेवढेच वजन, आकारमान असणारा एक दगड झोळीत ठेऊन पुन्ह चालू लागला. सुमारे एक कोस अंतरावर झपाझप आला. गुरुदेव मागून येऊन त्याला गाठण्यासाठी त्वरा करीत आहेत पण हा काही सापडत नाही, कोस दीड कोस पुढे आल्यावर त्यांना येऊ द्यावे म्हणून गोरक्षनाथ एका भव्य अशा औदुंबराच्या झाडाखाली थांबला. तेथे असलेल्या जलाशयातून पाणी घेतले आणि स्नान करून थकवा नाहीसा केला. भस्मलेपन झाल्यावर मीननाथला ही स्नान घातले. दरम्यानच्या काळात गुरुदेव ही तिथे पोहोचले. त्यांनीही स्नान केले. नित्य कर्मे उरकून विश्रांतीसाठी विसावले. अरण्यातली भयप्रद वाटणारी निबिडता कमी झाली होती. गुरुजी म्हणाले, "काय भयंकर अरण्य होते? मला तर काही सुचत नव्हते. भयाने पंगुत्व आल्यासारखे झाले होते. पाय उचलत नव्हता. आता पुढेही असेच घनघोर अरण्य असेल काय? तिथेही चोर, लुटारू, तस्करांचे भय असणारच नाही का?

"गुरुदेव, भीतीदायक गोष्ट मागेच गेली. आता तुम्हाला मुळीच भयाची बाधा होणार नाही. स्वस्थपणे आपली भ्रमंती सुरु राहणार आहे. आपल्या जवळ भिती बाळगण्यासारखे काहीच उरले नाही. चोरांचे भय वाटण्यासाठी आपल्याकडे द्रव्यधन किंवा सोने आहे का? आपल्याला कोण काय करणार आहे? "

गुरुदेव म्हणले, "वत्सा! अरे आपल्याकडे भरपूर धन आहेच मुळी. शुद्ध सुवर्णाची वजनदार वीट माझ्या झोळीत आहे. स्त्री राज्यातून आणली आहे म्हणूनच तर तुला मी तस्कर भयाबद्दल वारंवार विचारात होतो."

"गुरुजी सुर्वण वीट सुद्धा अशाश्वत आहे. केव्हाच ती भीती गेली आहे." शिष्याच्या बोलण्याचा अर्थ न समजल्याने ते विचारात पडले. याने वीट फेकली तर नाही ना? या शंकेने गुरुदेव झोळी पाहण्यास अस्वस्थ झाले. त्यांची अस्वस्थता पाहून शिष्याने त्यांना गर्भगिरी पर्वतावर फिरावयास नेले. तेथील निसर्गसौंदर्य पाहण्याच्या बहाण्याने दोन घटका वेळ घालविला. त्यामागील हेतू हा की गुरुदेवांना झोळीचा विसर पडावा. गोराक्षांनी हेतुपुरस्सर काही वेळ निग्रहाने मौन राखले. वन्यसौंदर्य निरीक्षणानंतर पुन्हा औदुंबर वृक्षाजवळ येऊन आपापल्या झोळ्या घेऊन पुढील प्रवासासाठी सिद्ध झाले. गोरक्षाला जाणवले की गुरुदेवांना सोन्याच्या विटेचा विसर पडलेला नाही. त्यंनी झोळी चाचपून पहिली तर आंतमध्ये विटेच्या वजनाएवढा धोंडा, बाहेर काढून तपासणी केली आणि खात्री झाल्यावर एकच आकांत केला. धरणीवर स्वतःला झोकून दिले आणि मोठमोठ्याने रुदन करू लागले. संतापाने शिष्यावर धावले, म्हणाले, "तूच माझी सुवर्ण वीट घालवलीस. तुला त्याचे ओझे झाले होते काय? जीवापाड सांभाळून आणलेले धन गेले रे! हातात असलेले वित्त जाते म्हणजे देवक्षोभच झाला. देवा!! माझी सुवर्ण वीट." असे म्हणून आल्या वाटेने धावत माघारी गेले. ठीकठिकाणी चाचपणी करीत परत आले. वीट सापडेना म्हणून कपाळ बडवून घेत धरणीवर अंग टाकले, म्हणाले, "मी आता जगणार नाही, प्राणत्याग करीन. माझा आत्मा पिशाच्च होऊन येथेच भटकणार. गोरक्षा! तू माझे धन आणून दे, नाहीतर आता तुझा माझा संबंध कायमचा संपला कारण तूच माझे निर्वाणीचे धन नाहीसे केलेस." असे निर्भात्सनेचे आणि निर्वाणीचे बोलणे ऐकून गोरक्षनाथ चमकले. गोष्ट या थराला जाईल असे त्यांनी गृहीत धरलेही नव्हते.

त्यंनी गुरुजींना सावरले आणि हाताला धरून पुन्हा पर्वतावर नेले. हा आपल्याला वीट दाखवायलाच नेत असावा असे समजून ते पर्वतकडा चढून माथ्यावर गेले. गोरक्षनाथांने गर्भगिरी पर्वत माथ्यावर लघुशंका केली. त्यानंतर शीरगुरूंना वंदन करून सिद्धयोग मंत्राने भस्म भारीत केले आणि फेकले. लखलखाट होऊन पिवळाधम्मक प्रकाश परावर्तित झाला. नवल म्हणजे संपूर्ण पर्वत सोन्याचा झाला. गुरुदेवांना वंदन करून म्हणाला, "महाराज! पाहिजे तितके सुवर्ण घ्यावे." ते पाहून मच्छिंद्रनाथ म्हणाले, "गोरक्षा! धन्य झालो तुझ्या सामर्थ्यापुढे, तुझ्यासारखा परीस असतांना मला सुवर्णाची आवश्यकता कशासाठी? सकळ सिद्धींना परिपूर्ण असा तू असतांना मला सुवर्णाशी काय घेणे देणे आहे. हाती आलेल्या हंसाचा त्याग करून कावळ्याला कशासाठी गोंजारत बसू? घरांत कामधेनु असताना ताकासाठी घरोघरी फिरणे उचित नाही. चिंतामणी घरात असताना चिंता करणे व्यर्थ नाही का? तुझ्यामुळे माझ्या जीवनाचे सोने झाले असताना हा सुवर्णपर्वत मला कशाला?" "गुरुदेव! मग आजपर्यंत तुम्ही त्या सोन्याच्या विटेचे ओझे कशासाठी वागवत होतात? त्याचे कारण मला सांगाल काय?" "वत्सा! ते सुवर्ण मोडून साधूसंतांसाठी, सज्जनांसाठी भंडारा घालावा, अशी माझी इच्छा होती." त्यावर गोरक्षनाथ उत्तरले, "ठीक आहे गुरुजी, आपली मनोकामना पूर्ण होईल."

गुरुजीविषयी आपण किती चुकीचा विचार करीत होतो, या खंतावलेल्या मनस्थितीत पर्वत पायथ्याजवळ येऊन मीननाथाला खांद्यावर घेऊन पुनश्च पर्वतमाथ्यावर आले. तिथे त्यांनी गंधर्वास्त्राचा जप केला आणि चित्रसेन गंधर्वाला पाचारण केले. तो हात जोडून प्रकट झाला. म्हणाला, "महाराज! काय सेवा करू? आज्ञा करावी."

गोरक्षनाथ म्हणाले, "गंधर्वनाथ चित्रसेन, आमच्या गुरुदेवांच्या इच्छेप्रमाणे भव्य भंडारा सोहळा आयोजित करावयाचा आहे. त्यासाठी इतर गंधर्वांना सुद्धा या ठिकाणी बोलवून घ्या. धरणीवरील सर्व साधूसंत, बैरागी, संन्याशी, जपी, तपी, सत्पुरुष यांना निमंत्रित करून आनंदी उत्सव मेळा करावा. सुरवर गंधर्व, देव, दानव, किन्नर या सर्वांना आमच्यावतीने

निमंत्रित करावे. "अवश्य" म्हणून चित्रसेनाने शंभर गंधर्वांना पाचारण केले. त्यांना एकूण प्रयोजनाचा हेतू आणि कार्यवाहीची रूपरेषा समजावून सांगितली आणि दशदिशांना रवाना केले. निमंत्रणाप्रमाणे जपी, तपी, योगी, ऋषी, कानफाटे नाथपंथी अवतारी, साधू संत, शुक्राचार्य, श्रीदत्तात्रेय, याज्ञवल्क्य, वसिष्ठ, वामदेव, कपिल, व्यास, पराशर, नारद, वाल्मिकी यांच्यासह अठ्ठयाऐंशी सहस्त्र ऋषी, स्वर्गातील देव, किन्नर, यक्ष, गंधर्व, वसुलोक, तपोलोक, अष्टवसुंसह उपरिचरही आले. त्यांनी मच्छिंद्रनाथांना किलोत्त्लेचा वृतांत सांगितला. देवांसह देवराज इंद्र आला. ब्रम्हा, विष्णू, महेश आले. सर्वजण नाथांना भेटून आपापल्या स्थानी आसनस्थ झाले. एकमेकांची विचारपूस, भेटीगाठी, क्षेमकुशल चर्चा करू लागले. गोरक्षनाथांनी अणिमा, गरिमा, वशितत्व, इशितत्व, प्रतिमा या अष्टसिद्धींना पाचारण केले. या हजर झाल्या आणि, "आज्ञा करावी स्वामी!" असे विचारल्यावर गोरक्ष म्हणाले, "अष्टसिद्धीप्रीयांनो, अतिंथीच्या पाहुणचारासाठी षड्रसयुक्त अन्न पकवान्ने निर्माण करावीत." "अवश्य!" असे आश्वासन देऊन अष्टसिद्धी कामाला लागल्या आणि पक्वनांचे ढीग उभे राहिले.

सप्त सटव्यांनी भुमिओ स्वच्छ करून सडासंमार्जन केले. या सप्त सटव्या ब्रम्हदेवाच्या आज्ञेत कार्यरत असतात. ब्रम्हदेवाच्या भाकिताप्रमाणे सजीवांच्या जन्मापूर्वी सटव्या त्यांच्या कपाळावरील अक्षरे वाचून पाहतात, की विधात्याने कोणत्या कामासाठी याची निर्मिती केली आहे. सप्त सटव्याचे वर्गीकरण असे की पहिली मानवाची, दुसरी दानवाची, वनचरांची, रानसटवी, घोडे, गाय, बैल, गावांतील पशु यांची घोडसटवी, पक्षीकुल खेचरांची वासत सटवी, जलचरांची अंबुधा सटवी, उदळी जातीची सबुधा सटवी अशा सात सटव्या ब्रम्हदेवाने निर्माण केल्या आहेत. कुमारी, धनदा, नंदा, विमला, लक्ष्मी विख्याता, प्रबळा, मंगला, देवता या नऊ जलदेवताही प्रकट झाल्या आणि पंगतीत वाढण्याचे काम करू लागल्या. तर अशा या भव्य दिव्य प्रयोजनासाठी गंधर्वांनी निमंत्रण दिले. अष्टवसुंनी स्वागत केले. अष्टभैरवांनी बैठकीची व्यवस्था सांभाळली. उपरिचरांनी दक्षिणा दिली, चित्रसेनाने तांबुलपान करण्याची व्यवस्था राबविली आणि प्रत्यक्ष भागीरथी गंगेने जलपान करविले. एकशेआठ तीर्थप्रवाहांनी उष्ट्या पत्राची स्वच्छता सांभाळली. साक्षात आदिनाथ श्रीशंकर हे पंक्तीला बसले. अप्सरा आणि किन्नर गायन करीत आहेत. धरणीवर स्वर्गच अवतरला आहे असा भास होत होता. त्या परमपावन भूमीवर आनंद सोहळा सुरु झाला होता.

अशा मंगलप्रसंगानी गोरक्षनाथांना गहिनीनाथांचे स्मरण झाले. ते महाराजांना म्हणाले, "गुरुदेव! सर्वजण आले आहेत या शुभप्रसंगी गहीनीला आणावे असे वाटते." श्रीगुरूंनीही, "योग्य विचार आहे पुत्रा!" असे म्हणत होकार दर्शविला. तसेच गंधर्वाला पाठवून मधुभटासह त्यांना घेऊन यावे." असेही सांगितले. मग चित्रसेनाला सांगून मधुभटासाठी सुलोचन गंधर्वाच्या हस्ते खास खलिता देऊन कनकगिरी ग्रामात रवाना केला. सुलोचनाने मधुभटाला भेटून पत्र दिले आणि गर्भाद्री पर्वतावरील सोहळयाचे वर्णन केले. मग सात वर्षाच्या गहिनीनाथाला घेऊन मधुभट मजल दरमजल करीत सहपरिवार येऊन पोहोचला. गहीनीला उभय नाथांच्या चरणी घातला. गुरुमहाराजांनी त्याला मांडीवर बसवून अत्यंत जिव्हाळयाने त्याचे कोडकौतुक केले. सर्वांना त्याची ओळख करून देत म्हणाले, "हे करभंजन नारायण असून चिखलाच्या गोळ्यापासून जन्माला म्हणून गहिनी असे नामकरण केले आहे." अशी सुरवात करून त्याच्या उत्पत्तीची कथा सर्वांना ऐकविली. त्यावर भाष्य करताना आदिनाथ श्री शिव म्हणाले, "मच्छिंद्रनाथ, भविष्यात आम्हाला अवतार घेऊन यांच्या करवी अनुग्रह प्राप्त होणार आहे. तरी त्याला अनुग्रह देऊन सर्व विद्यापारंगत करावे. हा माझा भावी गुरु किर्तीमान करावा." श्रीशिवाच्या इच्छेप्रमाणे गुरुदेव मच्छिद्रांनी, गोरक्षनाथांकरवी सर्वांच्या उपस्थितीत अनुग्रह देऊन

ब्रम्हपारायण केला. उत्सवाच्या आनंदात भर पडली जशी दुधात साखर! एक मासाने सोहळा समाप्तीचा समय आला. गोरक्षनाथांनी कुबेराला बोलावून सांगितले, "कुबेर महाराजा! हा सुवर्णपर्वत आपण घेऊन जा आणि त्या ऐवजी आम्हाला सत्कार समारंभासाठी वस्त्रभूषणे आणून द्यावीत." कुबेर उत्तरले, "कनकगिरी तूर्त येथेच असू द्यावा. आवश्यकता भासेल तेव्हा मी तो घेऊन जाईन. आता आपणास हवी तेवढी वस्त्र भूषणे, द्रव्य उपलब्ध करून देतो." त्यानंतर सर्व सन्माननीय अतिथींना योग्यतेप्रमाणे वस्त्रभूषणे, द्रव्य देऊन मान सन्मानाने संतुष्ट करून त्यांना निरोप देण्यात आला. सर्व अतिथी समाधानाने आशीर्वाद देऊन स्वस्थानी परतले. मच्छिंद्रनाथांनी उपरिचरांसोबत मीननाथाला किलोत्तलेच्या भेटीसाठी सिंहलद्वीपात पाठवून दिले. उपरिचरांनी मीननाथाला किलोत्तलेच्या स्वाधीन करून मच्छिंद्रनाथांची खुशाली सांगितली. मीननाथाला उराशी कवटाळून ती गतकाळच्या स्मृती आठवून रडू लागली.

इकडे गर्भाद्री पर्वतावर मच्छिंद्रनाथ नातशिष्य गहिनीनाथाला विद्याभ्यास शिकविण्यात रमून गेले. या प्रसंगाचे स्मरण म्हणून आदिनाथ श्रीशंकर 'म्हतारदेव' या नावाने अंशरुपात वास्तव्य करून राहू लागले. त्याच्या पश्चिमेस मढी गावात कानिफनाथ आपल्या शिष्य परिवारसह राहू लागले, मढीच्या समोर दक्षिणेस असलेल्या पर्वतशिखरावर मच्छिंद्रनाथांनी वास्तव्य केले. तेथून पूर्वेकडील पर्वतावर जालिंदरनाथ राहिले. गर्भाद्री पर्वताच्या पलीकडील ब्रम्हदेशात वडवानल गावी नागनाथ आणि विटे गावात रेवणनाथ राहिले आणि गर्भाद्री पर्वतच्या डाव्या बाजूस असलेल्या तीर्थस्थानी गोरक्षनाथ स्थायिक झाले, कुबेराने अदृश्य अस्त्राची पेरणी करून पर्वतावरील सुवर्ण झाकून टाकले.

एका वर्षापर्यंत गहिनीनाथांचा विद्याभ्यास अविरत सुरु होता, त्या काळात त्याचे मधुब्राह्मण जालिंदरनाथांच्या निवासानजिक येऊन स्थायिक झाले. गहिनीनाथही पुढे तेथेच वास्तव्यास राहिला. विद्या अभ्यासाच्या पूर्ततेनंतर मच्छिंद्रनाथ आणि गोरक्षनाथ यांनी विद्याभ्यास देऊन गहिनीनाथाला मधुब्रम्हणाकडे परत पाठविले.

भविष्यकाळात नाथांनी याच ठिकाणी समाधिस्त होऊन गुप्त रूपाने वास्तव्य केले. त्यांच्या समाधी स्थानांचे आकार यवनांच्या प्रार्थना स्थळांप्रमाणे अर्थात माशिदींसारखी आहेत. हजार वर्षांचा कालावधी उलटला पण गोरक्षनाथांच्या आदेशावरून आजतागायत त्या पर्वतांच्या रक्षणासाठी सटव्या कार्यरत आहेत. पुढे गोरक्षनाथ तीर्थाटनांसाठी निघून गेले.

पुढे यवनांच्या आगमनानंतर औरंगजेबाने या मशिदसदृश्य समाधी स्थळांबाबत चौकशी केली असता त्यास सांगण्यात आले की या फार पूर्वीपासून त्यांच्या पुर्वजांपासून अस्तित्वात आहेत. औरंगजेबाने त्या कबरींचा विध्वंस केला नाही पण त्यांची हिंदू नावे बदलून जालिंदराचे 'ज्ञानपीर' गहिनीनाथांचे 'गैबीपीर' मच्छिंद्रनाथांचे 'मायाबा' कानिफनाथांचे 'कानोबा', कल्याणयेथील कलबुर्गींचा बाबा म्हणजे चैतन्यबाबा यांचे 'राजबागशर' असे यवनी नामकरण केले आणि यवन पुजारी नियुक्त केले. त्यामुळे नाथपंथीयासाठीच्या आराधनेत व्यत्यय आला आही. कारण नाथांना अंतर्ज्ञाने 'यवनांच्या आक्रमणानंतर हिंदू देव देवतांवर गंडातर येणार. त्यांची देवळे उध्वस्थ करण्यात येतील' याची जाणीव झाली होती.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने घरातील सुवर्ण टिकून राहील.